**जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ (बांधकाम) संवर्गातील कनिष्ठ अभियंत्यांची दि.०१/०१/२०२१ रोजीच्या अंतिम ज्येष्ठतासूचीचे शुध्दीपत्रक.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः जिपअ-२०२३/प्र.क्र.२२०/आस्था-४**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक:- २१ जून, २०२३

संदर्भ:- १) शासन परिपत्रक क्रमांकःजिपअ-२०२२/प्र.क्र.२८३/आस्था-४ ,दिनांक १२ मे, २०२३
२) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्रमांक विकास/ज्येष्ठतासुची/कावि/११३०/२०२३, दिनांक २९-५-२०२३

**शासन शुध्दीपत्रक :-**

जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ ( बांधकाम ) ( अर्हताप्राप्त ) या संवर्गातील कनिष्ठ अभियंत्यांची दिनांक १.१.२०२१ अंतिम ज्येष्ठता यादी संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे.

२. सदर यादीमध्ये विहित कालावधीत व विहित प्रप्रत्रात माहिती प्राप्त न झाल्याने **श्री.पी.व्ही.इंगळे, श्री.व्हि.बी.घिवे, श्री.जे.बी.महाजन, श्री.ए.पी.कुळकर्णी** कनिष्ठ अभियंता ( बांधकाम ), जिल्हा परिषद, **बुलढाणा** यांच्या नियमित नियुक्ती दिनांकात व **श्री.व्हि.बी.घिवे यांच्या जन्म दिनांकात** सुधारणा करता आली नाही.

३. संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये विभागीय आयुक्त कार्यालयाने, जिल्हा परिषदेतील जिल्हा तांत्रिक सेवा, वर्ग-३ ( बांधकाम ) ( अर्हताप्राप्त ) या संवर्गातील कनिष्ठ अभियंत्यांच्या दिनांक १.१.२०२१ च्या अंतिम ज्येष्ठतामध्ये **श्री.पी.व्ही.इंगळे, श्री.व्हि.बी.घिवे, श्री.जे.बी.महाजन, श्री.ए.पी.कुळकर्णी** कनिष्ठ अभियंता ( बांधकाम ), जिल्हा परिषद, **बुलढाणा** यांच्या नियमित नियुक्ती दिनांकात व **श्री.व्हि.बी.घिवे यांच्या जन्म दिनांकात** यांच्या नियमित नियुक्ती दिनांकात बदल करण्याची विनंती केली आहे.

४. अंतिम ज्येष्ठता यादी प्रसिध्द झालेली असल्याने सदर शुध्दीपत्रकाव्दारे **श्री.व्हि.बी.घिवे यांच्या जन्म दिनांकात** १-७-१९६७ ऐवजी ०९-८-१९६६ असा बदल करण्यात येत आहे आणि **श्री.पी.व्ही.इंगळे** यांच्या नियमित नियुक्ती दिनांकात ८-३-१९९९ ऐवजी २६-२-१९९० **श्री.व्हि.बी.घिवे** यांच्या नियमित नियुक्ती दिनांकात ८-३-१९९९ ऐवजी २२-६-१९९० **श्री.जे.बी.महाजन** यांच्या नियमित नियुक्ती दिनांकात ८-३-१९९९ ऐवजी

२५-६-१९९० आणि **श्री.ए.पी.कुळकर्णी** यांच्या नियमित नियुक्ती दिनांकात ८-३-१९९९ ऐवजी २५-६-१९९० असा बदल करण्यात येत असून, त्यांची सेवाजेष्ठता **भाग-२ मध्ये** अनुक्रमे ३२९ **ऐवजी १३८ अ, ३२१ ऐवजी १४१ अ, ३०६ऐवजी १४१ ब, ३२३ ऐवजी १४१ क** असा बदल करण्यात येत आहे.

५. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०६२११२३७२००५२० असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सोबत :- ( भाग-२ ) सुधारित नोंद प्रपत्र**

DEEPAK BALKRISHNA RAUT

Digitally signed by DEEPAK BALKRISHNA RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=634c9b6f0a78aa8dc2a2cad23e9ebda886eae533288a003232dfa51925322f07, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=52DEE7DD608E1BF9A63F1C3E782CDF35FEBBFD44B3C12DB9684B5571AEA49117, cn=DEEPAK BALKRISHNA RAUT
Date: 2023.06.21 12:41:56 +05'30'

**( दिपक बाळकृष्ण राऊत )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२. सर्व विभागीय आयुक्त,
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यांना सदरहू ज्येष्ठता सुची शासनाच्या संकेतस्थळावरुन उपलब्ध करुन संबंधित कर्मचाऱ्यांच्या निर्दशनास आणून त्याप्रमाणे पोच विभागीय आयुक्तामार्फत शासनास सादर करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
४. निवड नस्ती. (ग्रामविकास विभाग/आस्था-४).

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | जिल्हा परिषद | जन्म दिनांक | शैक्षणिक पात्रता | कनिष्ठ अभियंता पदावरील नियमित नियुक्तीचा दिनांक | प्रवर्ग | व्यावसायिक अर्हता परीक्षा उत्तीर्ण/सुट | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| भाग-२ पदविकाधारक | | | | | | | | |
| **१३८ अ** | श्री.पी.व्ही.इंगळे | बुलढाणा | १४-१२-१९६७ | डीसीआरई | २६-०२-१९९० | इमाव | उत्तीर्ण | |
| **१४१ अ** | श्री.व्ही.बी.घीवे | बुलढाणा | ०९-८-१९६६ | डीसीई | २२-०६-१९९० | खुला | सुट | |
| **१४१ ब** | श्री.जे.बी.महाजन | बुलढाणा | ३०-०५-१९६६ | डीसीई | २५-०६-१९९० | खुला | सुट | - |
| **१४१ क** | श्री.ए.पी.कुलकर्णी | बुलढाणा | ०४-०८-१९६७ | डीसीई | २५-०६-१९९० | खुला | उत्तीर्ण | |